**श्री. गणेश नारायण शिंदे, पोलीस उपनिरीक्षक (चालक), अपर पोलीस आयुक्त, मोटार परिवहन विभाग, नागपाडा, बृहन्मुंबई, यांच्याकरीता पोलीस उपनिरीक्षक (चालक) संवर्गात एक अधिसंख्य पद निर्माण करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

**शासन निर्णय क्रमांक - एमटीएस-०३२२/प्र.क्र.६६/पोल-४,**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.

दिनांक - २४ जुलै, २०२३.

वाचा :- १) पोलीस सहआयुक्त,बृहन्मुंबई यांचे दिनांक १०.०१.२०२२ रोजीचा प्रस्ताव.

२) दिव्यांग व्यक्ती हक्क अधिनियम २०१६ मधील कलम २०(४).

३) सर.ज.जी. समूह रुग्णालयाचे दि.२३.०८.२०२२ रोजीचे प्रमाणपत्र.

४) वित्त विभागाच्या उच्चस्तरीय सचिव समितीच्या दि. १७.०४.२०२३ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.

प्रस्तावना :

श्री.गणेश नारायण शिंदे, पोउपनि चालक/२८६१६, अपर पोलीस आयुक्त, मोटार परिवहन विभाग, नागपाडा, मुंबई हे दिनांक ०१.०४.१९९१ पासून शासकीय सेवेत कार्यरत आहेत. श्री. शिंदे हे पोलीस उपनिरीक्षक (चालक) पदावर एस-१४ (३८६००-१२२८००) या वेतनश्रेणीत वेतन घेत आहेत. शासकीय सेवेत कार्यरत असताना श्री.शिंदे यांना अर्धांगवायू/लकवा हा आजार झाल्याचे निदान झाल्यामुळे त्यांना सर जे.जे.समुह रुग्णालय, वैद्यकीय मंडळाने पुढील सेवेसाठी त्यांना वैद्यकीयदृष्ट्या अपात्र ठरविले आहे. सर जे.जे.समुह रुग्णालयाकडून श्री.शिंदे यांना दि.२३.०८.२०२२ रोजी ५० टक्के अपंगत्वाचे प्रमाणपत्र देण्यात आले आहे. पोलीस उपनिरीक्षक (चालक) पदाला समकक्ष पद अपर पोलीस आयुक्त, मोटार परिवहन विभाग, नागपाडा, बृहन्मुंबई कार्यालयात उपलब्ध नसल्याने श्री.शिंदे यांचेसाठी अधिसंख्य पद निर्माण करण्यासंदर्भातील प्रस्ताव शासनास सादर करण्यात आला आहे. त्यानुसार दिव्यांग व्यक्ती हक्क अधिनियम २०१६ मधील कलम २०(४) मधील तरतूदीनुसार सेवेत कार्यरत असताना दिव्यांगत्व आल्यास कर्मचा-यास त्याच्या दिव्यांगत्वानुरुप सुयोग्य पदावर पदस्थापना दिली जाईल व मूळ धारण करत असलेल्या पदाचे वेतन संरक्षण दिले जाईल. सदर पद उपलब्ध नसल्यास कर्मचा-यास दुसरे सुयोग्य पद उपलब्ध होईपर्यंत किंवा त्याच्या नियत वयोमानानुसार सेवानिवृत्तीच्या दिनांकापर्यंत यापैकी जे आधी घडेल तोपर्यंत अधिसंख्य पदनिर्माण करुन त्यावर पदस्थापना दिली जाईल. सदर तरतूद विचारात घेऊन श्री.गणेश नारायण शिंदे, पोउपनि चालक/२८६१६ यांच्याकरीता सेवासंरक्षणासहीत सर्व लाभ देण्याकरीता पोलीस उपनिरीक्षक (चालक) या संवर्गातील एक अधिसंख्य पद दिनांक २१.०७.२०१८ पासून ते त्यांच्या नियत वयोमानानुसार सेवानिवृत्तीचा दिनांक ३०.०४.२०२३ पर्यंतच्या कालावधीसाठी निर्माण करण्यास उच्चस्तरीय सचिव समितीने मान्यता दिली आहे.

**शासन निर्णय-:**

श्री.गणेश नारायण शिंदे, पोउपनि चालक/२८६१६, अपर पोलीस आयुक्त, मोटार परिवहन विभाग, नागपाडा, बृहन्मुंबई यांचे एस-१४ (३८६००-१२२८००) या वेतनश्रेणीतील वेतन काढण्यासाठी पोलीस उपनिरीक्षक (चालक) संवर्गातील एक अधिसंख्य पद दिनांक २१.०७.२०१८ पासून ते त्यांच्या नियत वयोमानानुसार सेवानिवृत्तीचा दिनांक ३०.०४.२०२३ पर्यंतच्या कालावधीसाठी निर्माण करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर अधिसंख्य पद अपर पोलीस आयुक्त, मोटार परिवहन विभाग,नागपाडा, बृहन्मुंबई यांच्या आस्थापनेवर निर्माण करण्यात येत आहे.

३. सदर पद दिव्यांग व्यक्ती हक्क अधिनियम २०१६ मधील कलम २०(४) मधील तरतूदीनुसार, श्री.गणेश नारायण शिंदे, पोलीस उपनिरीक्षक (चालक) यांना सेवा संरक्षणासहित सर्व लाभ देण्याकरिता, दिनांक २१.०७.२०१८ पासून श्री.शिंदे यांच्या नियत वयोमानानुसार सेवानिवृत्तीच्या दिनांकापर्यंतच्या कालावधीसाठी निर्माण करण्यात येत आहे. त्यानंतर सदर पद आपोआप संपुष्टात येईल.

४. सदर पदाच्या वेतन व भत्त्यावरील खर्च हा " मागणी क्रमांक-बी-१, मुख्यलेखाशीर्ष २०५५-पोलीसउपलेखाशिर्ष-१०८, राज्य मुख्यालय पोलीस(०२) शहर पोलीस(०२)(०१)शहर पोलीस आस्थापना २०५५००९७-०१(वेतन) " या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग व सामान्य प्रशासन विभागाच्या सहमतीने तसेच वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक अनौसं ३३९/आपुक अनुसार व उच्च स्तरीय सचिव समितीच्या दिनांक १७.०४.२०२३ रोजी संपन्न झालेल्या बैठकीतील निर्णयानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२३०७२७१२४७५०१५२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SUDHAKAR
SHAHAJI YADAV

Digitally signed by SUDHAKAR SHAHAJI YADAV
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=3e782c1e59acd749fc48c691d7a8c477d6ac39c1904204f442b52d728d48a67a, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=A576ADA378C3E1DDFF427C2BC46B5A5C32BC32EF80F7A475ABFA122778AAAD72, cn=SUDHAKAR SHAHAJI YADAV
Date: 2023.07.27 12:57:12 +05'30'

**( सुधाकर यादव )**
**अवर सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.
२. महालेखापाल,(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य मुंबई/ नागपूर.
३. महालेखापाल ( लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य,मुंबई/नागपूर.
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
६. वित्त विभाग, आ.पु.क. कक्ष मंत्रालय,मुंबई.
७. सामाजिक न्याय व विशेषसहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
८. निवडनस्ती, पोल ४, गृह विभाग, मंत्रालय मुंबई-३२.